**राज्यात दुध उत्पादनास चालना देण्यासाठी ०६/ ०४/ ०२ दुधाळ संकरीत गायी/ म्हशींचे गट वाटप करणे या नाविन्यपुर्ण राज्यस्तरीय सर्वसाधारण, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी उपयोजनेंर्तगत योजनेस प्रशासकीय मंजुरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राज्ययो-२०१२/ प्र.क्र. १५९/ पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२**
**दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१५**

वाचा -

१) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्रमांकः राज्ययो- २०११/ प्र.क्र. ६७ /पदुम-४, दि. ०१.०७.२०११.

२) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. राज्ययो - २०१२/ प्र.क्र. १५९ / पदुम-४, दि. ३१.०१.२०१३.

**प्रस्तावना -**

राज्यात दुध उत्पादनास चालना देण्यासाठी ०६ दुधाळ संकरित गायी / म्हशींचे गट वाटप करणे या नाविन्यपुर्ण राज्यस्तरीय सर्वसाधारण, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजनेंर्तगत योजनेस वाचा येथील दि. ०१.०७.२०११ व दि. ३१.०१.२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात आलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सुधारणा करून ही योजना अधिक प्रभावीपणे राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यामुळे या योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात वाचा येथील दि. ०१.०७.२०११ व दि. ३१.०१.२०१३ रोजी निर्गमीत केलेले दोन्ही शासन निर्णय अधिक्रमित करून, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

राज्यात दुग्धोत्पादनास चालना देण्यासाठी सहा/चार/दोन संकरीत गाई/म्हशींचे गट वाटप करणे या नाविन्यपूर्ण राज्यस्तरीय योजनांतर्गत योजनेस (सर्वसाधारण/ अनुसूचित जाती उपयोजना/ आदिवासी उपयोजने अंतर्गत) याद्वारे, शासनाची प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. सदरची योजना खालील सविस्तर तपशिलानूसार राबविण्यात यावी.

## योजनेचे स्वरुप (आर्थिक निकष) -

या योजने अंतर्गत सहा/चार/दोन संकरीत गायी/म्हशींच्या एका गटाची किंमत खालीलप्रमाणे राहील.

| अ. क्र. | बाब | ६ जनावरांचा गट | ४ जनावरांचा गट | २ जनावरांचा गट |
|---|---|---|---|---|
| १. | संकरीत गायी/म्हशींचा गट - प्रति गाय/म्हैस रु. ४०,०००/- प्रमाणे | २,४०,०००/- | १,६०,०००/- | ८०,०००/- |
| २. | जनावरांसाठी गोठा | ३०,०००/- | ०.०० | ००.०० |
| ३. | स्वयंचलित चारा कटाई यंत्र | २५,०००/- | ०.०० | ००.०० |
| ४. | खाद्य साठविण्यासाठी शेड | २५,०००/- | ०.०० | ००.०० |
| ५. | ५.७५ % (अधिक १०.०३ % सेवाकर) दराने तीन वर्षाचा विमा | १५,१८४/- | १०,१२५/- | ५०६१/- |
| | एकूण | ३,३५,१८४/- | १,७०,१२५/- | ८५०६१/- |

सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थींना ६/४/२ दुधाळ जनावरांचा एक गट वाटप करतांना ५० टक्के तर, अनुसूचित जाती / जमातीच्या लाभार्थींना ७५ टक्के शासकीय अनुदान अनुज्ञेय राहील.

खुल्या प्रवर्गातील लाभार्थ्यांना अनुदानाव्यतिरिक्त उर्वरित ५० टक्के रक्कम तसेच, अनुसूचित जाती / जमातीच्या लाभार्थ्यांना अनुदानाव्यतिरिक्त उर्वरित २५ टक्के रक्कम स्वत: अथवा बँक / वित्तीय संस्थेकडून कर्ज रुपाने उभारावी लागेल. बँक / वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणाऱ्या (खुल्या प्रवर्गासाठी १० टक्के लाभार्थी हिस्सा व ४० टक्के बँकेचे कर्ज व अनुसूचित जाती / जमातीसाठी ५ टक्के लाभार्थी हिस्सा व २० टक्के बँकेचे कर्ज ) लाभार्थ्यांना या योजने अंतर्गत प्राधान्य देण्यात यावे.

## लाभार्थी निवडीचे निकष -

सर्वसाधारण प्रवर्गातील तसेच अनुसूचित जाती / जमातीच्या लाभार्थ्यांची निवड खालील घटकांवरून उतरत्या प्राधान्यक्रमाने करण्यात यावी.

१. महिला बचत गटातील लाभार्थी (अ.क्र. २ ते ३ मधील)
२. अल्प भूधारक शेतकरी (१ ते २ हेक्टर पर्यंतचे भूधारक)
३. सुशिक्षित बेरोजगार (रोजगार व स्वयंरोजगार केंद्रात नोंद असलेले)

**लाभार्थी निवड समिती -**

लाभार्थ्यांची निवड खालील जिल्हास्तरीय निवड समितीद्वारे करण्यात यावी.

| | |
|---|---|
| १. जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी (राज्यस्तर) | सदस्य |
| ३. प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ४. जिल्हा महिला व बाल कल्याण अधिकारी (राज्यस्तर) | सदस्य |
| ५. जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी | सदस्य |
| ६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ७. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त | सदस्य सचिव. |

**योजनेच्या अंमलबजावणीबाबत सर्वसाधारण मार्गदर्शक सुचना, अटी व शर्ती -**

१. अंमलबजावणी अधिकाऱ्याने या योजनेस जिल्हा माहिती अधिकारी कार्यालयामार्फत वृत्तपत्रांमधून प्रसिध्दी द्यावी. तसेच, सर्व प्रकारच्या प्रसिध्दी माध्यमाद्वारे त्याचप्रमाणे राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय आणि तालुकास्तरीय शेतकरी मेळावे, भित्तीपत्रके, फ़्लेक्स बोर्डस इ. द्वारे व्यापक प्रसिध्दी देऊन लाभार्थीकडून अर्ज मागविण्यात यावेत.

२. योजनेचा लाभ मिळण्यासाठी लाभार्थ्यांने करावयाच्या अर्जाचा नमुना व त्यासोबत जोडावयाची इतर आवश्यक कागदपत्रे याचा तपशिल, तसेच, गोठयाचा आराखडा, आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावर निश्चित करून, तो क्षेत्रिय अधिकाऱ्यांना पाठवावा. तसेच, सदर अर्जाचा नमुना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित जिल्हाधिकारी यांच्या कार्यालयाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करावा.

३. लाभार्थी निवडताना ३० टक्के महिला लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

४. तालुकास्तरीय अधिकाऱ्यांनी )पशुधन विकास अधिकारी-विस्तार) लाभार्थ्यांचे अर्ज स्वीकारुन प्राप्त झालेले सर्व अर्ज जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत जिल्हास्तरीय लाभार्थी निवड समितीच्या मान्यतेसाठी जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांचेकडे सादर करावेत. प्राप्त झालेल्या सर्व अर्जांची तारीखनिहाय नोंद स्वतंत्र नोंदवहीत ठेवण्यात यावी.

५. लाभार्थ्यांचे अर्ज स्वीकारण्यासाठी एका महिन्याची मुदत देण्यात यावी. या मुदतीनंतर अर्ज स्वीकारु नयेत. प्राप्त झालेल्या सर्व अर्जांची छाननी करून एका महिन्याच्या कालावधीत जिल्हा निवड समितीमार्फत पात्र लाभार्थ्यांची निवड व प्रतिक्षा यादी तयार करण्यात यावी. ज्या लाभार्थींच्या वैध अर्जांचा विचार त्या आर्थिक वर्षात आर्थिक तरतुदीं अभावी करता आलेला नाही असे मागील आर्थिक वर्षात प्रलंबित असलेले वैध अर्ज व पुढील आर्थिक वर्षात प्राप्त होणारे नवीन अर्ज हे या योजनेंतर्गत लाभार्थींची निवड करण्यासाठी विचारात घेण्यात यावेत.

६. जिल्हास्तरीय लाभार्थी निवड समितीने निवड केलेल्या लाभार्थ्यांची यादी आयुक्त पशुसंवर्धन तसेच ,संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी आणि जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्या कार्यालयाच्या सूचना फलकावर तसेच, संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात यावी व निवड झालेल्या लाभार्थ्यांना त्याबाबत कळविण्यात यावे.

७. योजनेसाठी लाभार्थ्यांची निवड झाल्यानंतर लाभार्थ्यांनी एक महिन्याच्या कालावधीत लाभार्थी हिश्याची रक्कम अथवा बँकेचे कर्ज उभारणे आवश्यक राहील. असे न केल्यास, प्रतिक्षा सूचीवरील पुढील लाभार्थीस या योजनेचा लाभ देण्यात यावा.

८. एका कुटूंबातील एकाच व्यक्तीस या योजनेचा लाभ देण्यात यावा. या योजनेंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थीस पून्हा सदर योजनेचा लाभ देण्यात येऊ नये.

९. ही योजना शक्यतो क्लस्टर स्वरुपात आणि अस्तित्वातील / प्रस्तावित दूध संकलन मार्गावरील गावांमध्ये राबविण्यात यावी व त्यानूसार लाभार्थींची निवड करण्यात यावी.

१०. या योजनेमध्ये वाटप करावयाची दूधाळ जनावरे प्रतिदिन १० ते १२ लिटर दूध उत्पादन असलेल्या एच एफ, जर्सी या संकरित गायी तसेच, मुऱ्हा व जाफराबादी या सुधारित जातीच्या म्हशी दुसऱ्या / तिसऱ्या वेतातील असाव्यात. त्या शक्यतो १-२ महिन्यांपूर्वी व्यालेल्या असाव्यात.

११. दुधाळ जनावरांची खरेदी खालील समितीद्वारे करण्यात यावी. दुभती जनावरे लाभार्थ्यांच्या पसंतीने खरेदी करावीत.

**दुधाळ जनावरे खरेदी समिती :**

१) संबंधित तालुक्याचे पशुधन विकास अधिकारी (विस्तार), पंचायत समिती.

२) कार्यक्षेत्रातील पशुवैद्यकीय दवाखान्याचे संस्थाप्रमुख (सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन/ पशुधन विकास अधिकारी / सहाय्यक पशुधन विकास अधिकारी / पशुधन पर्यवेक्षक)

३) गावातील प्राथमिक सहकारी दुध संस्थेचे प्रतिनिधी .

४) बँक प्रतिनिधी .

५) विमा प्रतिनिधी.

६) लाभार्थी .

१२. दूभत्या संकरीत गायी / म्हशींची खरेदी शक्यतो राज्याबाहेरून करण्यात यावी. त्यानूसार आवश्यक ते नियोजन करावे.

१३. या योजनेअंतर्गत वाटप करण्यात येणाऱ्या दूधाळ जनावरांचा लाभार्थी व संबंधित जिल्ह्यातील जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्या संयुक्त नावाने ३ वर्षांसाठी विमा उतरविण्यात यावा.

१४. योजनेमध्ये वाटप केलेले जनावर मृत झाल्यास विम्याच्या पैशातून व खात्याच्या संमतीने लाभार्थीस दुसरे जनावर खरेदी करून पुरविण्यात यावे.

१५.सदर योजना राबवितांना प्रथमत: तीन / दोन / एक दूधाळ जनावरांचा पुरवठा करण्यात यावा व सहा महिन्यांनतर किंवा सदरची दूभती जनावरे आटल्यानंतर (यामधील जो कालावधी कमी असेल तदनंतर) उर्वरीत तीन / दोन / एक दूधाळ जनावर पुरविण्यात यावे.

१६. या योजनेंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थींची यादी संबंधित पशुधन विकास अधिकारी (विस्तार) यांनी कार्यक्षेत्रातील पशुवैद्यकीय संस्था व संबंधित ग्रामपंचायत यांचे स्तरावर उपलब्ध करून द्यावी. पशुधन विकास अधिकारी (विस्तार) यांनी तसेच, कार्यक्षेत्रातील पशुवैद्यकीय संस्थांनी लाभार्थींची नोंद पशुधनाच्या तपशिलासह स्वतंत्र नोंदवहीत घ्यावी व पाठपूरावा करावा.

१७. दूधाळ जनावरांचे वाटप केलेले लाभार्थी ज्या पशुवैद्यकीय दवाखान्याच्या कार्यक्षेत्रातील असतील, त्या तालुका लघुपशुवैद्यकीयसर्वचिकित्सालयाचे सहायक आयुक्त पशुसंवर्धन, पशुवैद्यकीय दवाखान्यावरील पशुधन विकास अधिकारी / सहायक पशुधन विकास अधिकारी / पशुधन पर्यवेक्षक यांचेद्वारे सदर दूधाळ जनावरांना आरोग्यविषयक आणि पैदासीच्या सूविधा उपलब्ध करून देण्यात याव्यात व त्याची नोंद स्वतंत्र नोंदवहीमध्ये घेण्यात यावी. तसेच, सदर अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत दर तिमाहीस वाटप केलेल्या दूधाळ जनावरांच्या लाभार्थी / पशुपालकांच्या घरी जाऊन १०० टक्के पडताळणी करण्यात यावी व त्याचा अहवाल पशुधन विकास अधिकारी (विस्तार) यांचेमार्फत वरिष्ठांस सादर करण्यात यावा.

१८. पशुधन विकास अधिकारी (विस्तार) यांनी तालुक्यात वाटप केलेल्या एकूण दूधाळ जनावरांच्या २५ टक्के जनावरांची प्रत्यक्ष पडताळणी करावी. तसेच, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांनी जिल्ह्यात वाटप केलेल्या एकूण दूधाळ जनावरांपैकी प्रत्येकी १० टक्के जनावरांची प्रत्यक्ष पडताळणी करावी व तसा अहवाल वरिष्ठ कार्यालयास सादर करावा.

१९. योजना कालावधी संपल्यानंतर ६ महिन्यांनी आयुक्त पशुसंवर्धन हे प्रत्येक विभागासाठी संबंधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमून या योजनेचे मुल्यमापन करतील. या अहवालानूसार आयुक्त पशुसंवर्धन त्यांच्या अभिप्रायासह सदर योजनेचा मुल्यमापन अहवाल शासनास सादर करतील.

२०. लाभार्थीस हा व्यवसाय किमान ३ वर्ष करणे आवश्यक राहील.

२१. लाभार्थींनी योजनेंतर्गत दिलेल्या शासकिय अनुदानाचा गैरविनियोग केल्याचे निदर्शनास आल्यास, अनुदानाची व्याजासह एकरकमी वसूली ,महसूली कार्यपध्दीने लाभार्थींकडून करण्यात यावी.

२२. या योजनेंतर्गत निवडलेल्या लाभार्थ्यांकडून घ्यावयाच्या बंधपत्राचा प्रारुप शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेऊन आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावर अंतिम करून तो क्षेत्रीय अधिकाऱ्यांना पाठविण्यात यावा.

२३. लाभार्थ्यांकडे सहा / चार / दोन दूधाळ जनावरांचे पालन करण्यासाठी पूरेशी जागा उपलब्ध असावी.

२४. लाभार्थ्यांने दुग्ध व्यवसाय ,गो / म्हैस पालन विषयक प्रशिक्षण घेणे आवश्यक राहील.

२५. दूधाळ जनावरांच्या खरेदीनंतर जनावरे वाहतुकीचा संपूर्ण खर्च लाभार्थ्याने करावा.

२६. लाभार्थ्याने विहीत नमून्यात बंधपत्र करून देणे आवश्यक राहील.

२७. सदर योजनेचे अंमलबजावणी अधिकारी तसेच, आहरण व संवितरण अधिकारी जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त राहतील. विभागीय स्तरावर संबंधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन व राज्याकरिता आयुक्त पशुसंवर्धन हे संनियंत्रण अधिकारी राहतील.

२८. या योजनेसाठी वित्तीय कर्ज पुरवठयासाठी आवश्यक तरतूद संबंधित जिल्ह्याच्या पोटेन्शियल लिंक्ड क्रेडिट प्लान )Potential Linked Credit Plan (मध्ये करणेबाबत आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावरून सर्व संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.

२९. सदरची योजना राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर तसेच, दुग्धोत्पादनामध्ये स्वयंपुर्ण असलेले पुणे, सातारा, सांगली, सोलापुर, कोल्हापूर व अहमदनगर हे जिल्हे वगळून उर्वरीत सर्व जिल्ह्यांमध्ये राबविण्यात यावी. तथापि, दुष्काळग्रस्त / टंचाईग्रस्त जिल्ह्यांमध्ये ज्या ठिकाणी ओलिताच्या सोयी आहेत व चाऱ्याची उपलब्धता आहे, अशा भागांमधील लाभार्थीना लाभ देण्यात यावा.

३०. सदर योजनेच्या आर्थिक निकषांच्या अधीन राहून योजना यशस्वीपणे राबविण्याकरिता आवश्यक त्या इतर मार्गदर्शक सूचना, आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावरून क्षेत्रिय अधिकाऱ्यांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१५४८२३५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2015.10.30 15:54:17 +05'30'

**(श. मा. साठे)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य
५. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांचे मध्यवर्ती कार्यालय
६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (०५ प्रती)
९. मुख्य सचिवांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, महिला व बाल कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई
१५.सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे ७. (०५ प्रती)
१७.जिल्हाधिकारी (सर्व),
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१९.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२०.प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, (सर्व).
२१.विधिमंडळ ग्रंथालय (१० प्रती)
२२.उपसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती.
२३.जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, (सर्व)
२४.जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व).
२५.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२६.निवड नस्ती पदुम-४.